**भूमि अभिलेख विभागासाठी संगणकीकरणासाठी संगणक व अनुषंगिक साहित्य खरेदीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण -२०१५/ प्र.क्र. ३१३/ ल-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३० मार्च, २०१७

<u>वाचा</u> -१) महसूल विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.२५/०३/२०१५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
२) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. संकीर्ण-२०१४/ प्र.क्र. १३२/ ल-१, दि. ३१/०३/२०१५.
३) शासन निर्णय, माहिती तंत्रज्ञान विभाग क्र.मातंसं-१७१६/प्र. क्र. २८६/३९ दि. ९/०८/२०१६.
४) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (म.राज्य), पुणे यांचे पत्र क्र.लेखा-३/ पु.अ.मा. १६.१७/२०१६/ ५४७, दिनांक ०३/१०/२०१६.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र. ७/कोषा-प्र. ५, दि. १७.०१.२०१७.
६) महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ मर्यादीत यांचे पत्र क्र. महाआयटी/पीएसआर/००१/२०१७, दि. २२/०३/२०१७

**<u>प्रस्तावना-</u>**

भूमि अभिलेख विभागामध्ये "ई-ऑफिस" संकल्पना कार्यान्वित करण्यासाठी महसूल विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.२५/०३/२०१५ रोजीच्या बैठकीमध्ये प्राप्त मान्यतेनुसार संगणक व अनुषंगिक सामुग्री खरेदी करण्यासाठी रुपये ३३३.६१ लाख इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली असून सदर प्रशासकीय मान्यतेच्या रक्कमे पैकी रु. १.०० कोटी इतका निधी संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये यापूर्वीच जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य पुणे यांना वितरीत करण्यात आला आहे. माहिती तंत्रज्ञान विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेले महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ हे, माहिती तंत्रज्ञान विषयक संयंत्रे, साधनसामुग्री व सेवांचा पुरवठा करणारी राज्याची एकमेव यंत्रणा असेल असे सदर शासन निर्णयान्वये घोषित करुन सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ६.१ अन्वये शासकीय विभागांना सदर महामंडळाच्या मागणीप्रमाणे प्रत्येक प्रकल्पासाठी अग्रीम निधी महामंडळास प्रदान करण्यासही मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच, संदर्भाधीन क्र. ६ येथील पत्रान्वये संगणक विषयक विचाराधीन पुरवठ्यासंदर्भात महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाने रु. ९०.०० लक्ष इतका निधी सदर महामंडळाकडे आगाऊरित्या जमा करण्याबाबत कळविले आहे. त्यानुसार भूमि अभिलेख विभागामध्ये "ई ऑफिस" संकल्पना राबविण्याकामी आणखी रु. ९०.०० लक्ष इतका निधी जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यासंदर्भात शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**<u>शासन निर्णय-</u>**

०१ भूमि अभिलेख विभागात "ई-ऑफीस" संकल्पना राबविण्याकामी सदर विभागाकरीता संगणक व अनुषंगिक सामुग्री खरेदीसाठी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडे अग्रीम स्वरुपात निधी वर्ग करण्यासाठी रु. ९०.०० लक्ष इतका निधी जमाबंदी आयुक्त व संचालक भुमि अभिलेख महाराष्ट्र राज्य यांना याव्दारे वितरीत करण्यात येत आहे.

०२. या प्रयोजनासाठी जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

०३. सदर खर्च "मागणी क्रमांक सी १, २०२९ १०२ सर्व्हेक्षण व जमाबंदीची कामे (००) (०१) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, (महाराष्ट्र राज्य) पुणे याची आस्थापना (२०२९०३४२)" या लेखाशीर्षाखाली सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षात मंजूर योजनेतर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २०५/अर्थ ६/१७, दि. ८/०२/२०१७, अनौ.सं. ७२/२०१७/ व्यय-१०, अनौ.सं.क्र. २०१७/४७/कोषा प्र.५, दि.१४/०३/२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०२०२४३१७०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2017.03.30 20:28:41 +05'30'

**( डॉ. संतोष भोगले )**
**उप सचिव**
**महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. मा. प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान), माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
८. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (महाराष्ट्र राज्य), पुणे
९. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
११. कोषागार अधिकारी, पुणे
१२. माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. वित्त विभाग,कार्यासन क्र. व्यय १०/अर्थसंकल्प-६/कोषा प्रशा-५, मंत्रालय, मुंबई
१४. निवड नस्ती ल-१.